**नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.४२, दि.२९/०५/२०१७ विखंडीत करण्यासाठी, निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नामपा-२०१७/प्र.क्र.२६६/नवि-२४,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २७ सप्टेंबर,२०१८.

**संदर्भ :-** आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र.जा.क्र.नांवाशमनपा/साप्रवि/आस्था-सेल/७८८१/१७ दिनांक ०५/०९/२०१७

**प्रस्तावना :-**

नांदेड वाघाळा महानगरपालिकेत जेएनएनयुआरएम,बिसयुपी,पाणी पुरवठा, गुंठेवारी व यांत्रिकी विभागासाठी एकत्रित वेतनावर श्री.हनुमंत सदाशिव पवार यांची कंत्राटी कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात दि.१५.६.२०११ च्या आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली. श्री.पवार यांना स्वच्छ महाराष्ट्र अभियान अंतर्गत वैयक्तीक शौचालय बांधणीचे काम प्राधान्याने पूर्ण करण्यासाठी वरिष्ठांनी निर्देश दिलेले असताना ऐन कामाच्या वेळी खोटी वैद्यकीय रजा सादर करुन वरिष्ठांची दिशाभूल केली आहे. प्रस्तुत प्रकरणात श्री.पवार यांना यापूर्वी कामात निष्काळजीपणा करुन वरिष्ठांची दिशाभूल केल्याप्रकरणी अपचारी कर्मचाऱ्यास द्यावयाच्या वाजवी संधीच्या अनुषंगाने महानगरपालिकेच्या सेवेतून कमी का करण्यात येऊ नये याबाबतची कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली होती. परंतु, श्री.पवार यांनी सदर नोटीसीच्याबाबत समाधानकारक खुलासा सादर केलेला नाही. श्री.पवार हे दि.८.७.२०१६ पासून कामावर कार्यरत नसून, कामचुकारपणा करणे, निष्काळजीपणा करणे, आदेशाचे उल्लंघन करणे, इ.कारणामुळे त्यांची विभागास आवश्यकता नसल्याचा अहवाल संबंधित विभागाने सादर केलेला आहे. उक्त सर्व बाबी विचारात घेता श्री.पवार यांना महानगरपालिकेच्या सेवेची आवश्यकता आहे असे वाटत नाही. म्हणून श्री.हनुमंत सदाशिव पवार यांना कंत्राटी कनिष्ठ अभियंता या पदावरुन महानगरपालिकेच्या कंत्राटी सेवेतून दि.१६.३.२०१७ च्या आदेशान्वये कायमचे कमी करण्यात आले.

२. श्री.हनुमंत सदाशिव पवार, यांनी उपरोक्त शिक्षेच्या विरुध्द महानगरपालिकेच्या स्थायी समितीकडे दि.३०.०३.२०१७ रोजी अपिल सादर करुन त्यांना पूर्ववत कामावर घेण्याची विनंती केली होती. स्थायी समितीने श्री.हनुमंत सदाशिव पवार यांना पूर्ववत कामावर घेण्याची अपिल मंजूर करुन त्यांना कंत्राटी सेवेतून कायमचे कमी केलेला दि.१६.०३.२०१७ चा आदेश रद्द करुन त्या दिनांकापासून कामावर रुजू होईपर्यंतचा कालावधी कर्तव्यकाळ गृहीत धरण्याबाबतचा ठराव क्र.४२, दि.२९.५.२०१७ पारीत केलेला आहे.

३. सदर ठराव हा प्रशासकीय टिप्पणीच्या विरुध्द असून नियमबाह्य आहे. त्यामुळे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.४२ दि.२९/०५/२०१७ विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी दिनांक ०५/०९/२०१७ च्या पत्रान्वये केलेली आहे.

४. उपरोक्त नमूद बाबीं विचारात घेता महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.४२,दि.२९/०५/२०१७ हा व्यापक लोकहिताच्या विरुध्द असल्याचे शासनाचे मत झाल्याने सदर ठराव निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेचा स्थायी समितीचा ठराव क्र.४२, दि.२९.०५.२०१७ हा व्यापक लोकहिताच्या विरुध्द आहे. त्यामुळे सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) नुसार विखंडित करण्यासाठी प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

२. सदर ठराव निलंबनाप्रकरणी संबंधितांना अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०९२९१६५९५०४८२५ असा आहे हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2018.09.29 17:04:12 +05'30'

**( कैलास बधान )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव,मंत्रालय,मुंबई-३२
२. आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
३. नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका,नांदेड
४. प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
५. उपसचिव, यांचे स्वीय सहाय्यक, नवि-२४,नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती)